**सन २०१७-१८ मध्ये नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्पाकरिता ₹ २९८.९० लाख निधी वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : राकृवि-०६१६/प्र.क्र.७९/राकृवियो कक्ष**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : १८ जुलै, २०१७

**वाचा**:-

१. कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र. हअप्र-७१६/प्र. क्र. ८२ /राकृवियो कक्ष, दि.०७/०७/२०१६
२. कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र. हअप्र-७१६/प्र. क्र. ८२ /राकृवियो कक्ष, दि.१०/०८/२०१६
३. कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र. हअप्र-७१६/ प्र. क्र. ८२ /राकृवियो कक्ष, दि. २८/१०/२०१६
४. कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र. हअप्र-७१६/प्र. क्र. ८२ /राकृवियो कक्ष, दि.१७/०१/२०१७
५. वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/अर्थ-३ दि. १८/०४/२०१७
६. नानाजी देशमुख कृषि संजीवन प्रकल्प, कार्यालयाचे पत्र क्र. नादेकृसंप्र /प्रशा /प्र.क्र.१७ /२०१७, दि.१२/०६/२०१७

**प्रस्तावना** :-

विदर्भ व मराठवाडयातील सुमारे ४००० दुष्काळग्रस्त गावांमध्ये तसेच विदर्भातील पूर्णा नदीच्या खोऱ्यातील खारपाण पट्टयातील सुमारे ९०० गावांमध्ये जागतिक बँकेच्या अर्थसहाय्याने रु. ४००० कोटी अंदाजित खर्चाचा नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्प (पूर्वीच नाव - हवामान अनुकूल कृषि प्रकल्प - PoCRA) राबविण्यास संदर्भाधिन दि. ०७.०७.२०१६ रोजीच्या शासन निर्णयांन्वये तत्वत: मंजूरी प्रदान केलेली आहे. त्याचप्रमाणे, दि.१०.८.२०१६ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रकल्प व्यवस्थापन कक्षाची (PMU) मुंबई येथे २३ पदांसह स्थापना करण्यात आली आहे.

चालू वर्षी प्रकल्प व्यवस्थापन कक्षास, प्रकल्पाचा आराखडा तयार करण्याकरिता तसेच, आस्थापना विषयक विविध बाबींवर खर्च अपेक्षित आहे (प्रकल्प अंमलबजावणी आराखडा तयार करणे, प्रकल्प व्यवस्थापन कक्षास अधिकारी/कर्मचारी यांचे वेतन भत्ते, प्रशिक्षण,दौरे इ.). या बाबींवरील खर्चासाठी सन २०१७-१८ मध्ये प्रकल्पाच्या राज्य हिस्स्याच्या लेखाशिर्षाखाली अर्थसंकल्पित केलेल्या तरतूदीतून निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती, त्यानुषंगाने शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे -

**शासन निर्णयः**

१. या शासन निर्णयान्वये सन २०१७-१८ करीता नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्पाकरीता राज्य हिस्याचा एकूण **₹२९८.९० लाख (रुपये दोन कोटी अठ्यान्नव लाख नव्वद हजार फक्त) निधी** प्रकल्प संचालक, नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्प, मुंबई यांना अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीद्वारे वितरीत करण्यात येत आहे. सदर निधी खालील लेखाशिर्षांतर्गत सन २०१७-१८ करिता अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या तरतुदीतून खर्ची टाकावा.

२४०१ पीक संवर्धन
(११५) लहान / सीमांत शेतकऱ्यांची आणि शेत मजूराची योजना
(००) (०३) हवामान अनुकूल कृषि प्रकल्प (राज्य हिस्सा ३० टक्के)
(२४०१ A६५५),
०१ - वेतन
०३ - अतिकालीक भत्ता
०६ - दुरध्वनी, वीज व पाणी शुल्क
१० - कंत्राटी सेवा
११ - देशांतर्गत प्रवास खर्च
१२ - विदेश प्रवास खर्च
१३ - कार्यालयीन खर्च
१४ - भाडेपट्टी व कर
१७ - संगणक खर्च
२६ - जाहीरात व प्रसिद्धी
२८ - व्यवसायीक सेवा
३० - इतर कंत्राटी सेवा
३३ - अर्थसहाय्य
५० - इतर खर्च

२. या शासन निर्णयान्वये उपलब्ध करुन देण्यात येत असलेल्या ₹ २९८.९० लाख निधीचे कोषागारातून आहरण व वितरणाकरिता प्रकल्प संचालक, नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्प, मुंबई यांना नियंत्रण अधिकारी आणि वित्त विशेषज्ञ, नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्प, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. सदर प्रकल्प जागतिक बँकेच्या अर्थसहाय्याने राबविण्यात येत असल्याने जागतिक बँकेने वेळोवेळी दिलेल्या दिशानिर्देशानुसार सदर प्रकल्पाचा आराखडा तयार करण्यात यावा. त्यानुसार, सदर वितरीत निधी केवळ तातडीच्या आणि अनिवार्य अशा आस्थापना आणि प्रकल्पाच्या तयारी विषयक बाबींसाठी आहरीत करावा, तसेच निधीच्या खर्चाची निकड व औचित्याची पडताळणी प्रकल्प संचालकांनी करावी.

४. या शासन निर्णयान्वये उपलब्ध करुन देण्यात आलेल्या निधीचा तात्काळ विनियोग करण्यात यावा तसेच प्रकल्प संचालक, नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्प, मुंबई यांनी वेळोवेळी उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

५. हा शासन निर्णय वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/अर्थ-३ दि. १८ एप्रिल, २०१७ नुसार विहीत केलेल्या अटींची पुर्तता होत असल्याने, सदर परिपत्रकानुसार या विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांनुसार तसेच वित्त विभागाच्या अनौपाचारिक क्र. अनौसं-२६१/अर्थ-१३, दि. १५/०७/२०१७ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०७१८१५४०४१०६०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shrikant Chandrakant Andge

Digitally signed by Shrikant Chandrakant Andge
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5d5ab93b4e4f2fcd87e12fe19b8965025d482b1bee0fffaa62085c34db6bfd8c, cn=Shrikant Chandrakant Andge
Date: 2017.07.18 15:37:08 +05'30'

**(श्रीकांत चं. आंडगे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
२. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
३. प्रधान सचिव (कृषी व पणन), कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. प्रधान सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. प्रकल्प संचालक, नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्प, मुंबई.
६. आयुक्त (कृषि), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
७. महालेखाकार (स्थानिक निकाय लेखा परिक्षा व लेखा), मुंबई.
८. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपुर
९. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपुर
१०.वित्त विभाग (कार्या. व्यय-१ / अर्थसंकल्प - १३), मंत्रालय, मुंबई
११.मा. मंत्री (कृषी) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
१२.मा. राज्य मंत्री (कृषी) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
१३.निवड नस्ती.